**हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या अंमलबजावणी संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाने आणि राष्ट्रीय अनुसूचित जाती आयोगाने दिलेल्या निर्देशांची अंमलबजावणी करणे तसेच, नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये स्वच्छता शीघ्रकृती दल (ERSU) ची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०२०/प्र.क्र.४/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३० जानेवारी, २०२०

**<u>पहा</u>:-** (१) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र:स्वमअ-२०१८/प्र.क्र.१०८/नवि-३४, दि ५/३/ २०१८
(२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. हामैऊ/ प्र.क्र. २६८/ अजाक, दिनांक १२ डिसेंबर, २०१९
(३) केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व नागरी कार्य मंत्रालयाचे पत्र क्र. D.O.Z-१६०२५/३/२०१८-CPHEEO, दि. २६ ऑगस्ट, २०१९
(४) अवर सचिव,राष्ट्रीय अनुसूचित आयोग,भारत सरकार पत्र क्र.११/६/NCSC/२०१८-सी.सेल, दिनांक २३/९/२०१९
(५) केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व नागरी कार्य मंत्रालयाचे पत्र क्र. D.O. Z-१६०२५/२१/२०१९-CPHEEO, दिनांक ४ नोव्हेंबर, २०१९

**<u>प्रस्तावना:</u>**

केंद्र शासनाने हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामागारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन करणे अधिनियम, २०१३ (२०१३ चा २५) पारीत केला असून, सदर कायदा दिनांक ६ डिसेंबर, २०१३ पासून लागू केला आहे. या अधिनियमांतर्गत केंद्र शासनाने नियम केले असून, सदर नियम दिनांक १२ डिसेंबर, २०१३ च्या भारत सरकारच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनिमय, २०१३ च्या अनुषंगाने बंदिस्त जागा उदा. सेप्टिक टँक, भूमिगत गटारे इत्यादी मध्ये काम करताना घ्यावयाच्या दक्षतेबाबत मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत.

३. हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या प्रभावी अंमलबजावणी बाबत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना सविस्तर सूचना देण्याची बाब तसेच, भूमिगत मलनिःसारण यंत्रणेची अथवा सेप्टिक टँकची देखभाल व दुरुस्ती करताना अथवा ते साफ करण्यासाठी सफाई कामगारास मॅनहोल (manhole) मध्ये / नाल्यात उतरून साफ करावे लागते, अशावेळी आवश्यक ती काळजी घेतली न गेल्याने अपघातांच्या व प्रसंगी सफाई कामगारांच्या मृत्युच्या घटना घडतात, हे टाळण्यासाठी व त्यांना तातडीने मदत पोहोचविण्यासाठी राज्यातील सर्व नागरी स्थानिक संस्था व महानगरपालिका क्षेत्रांमध्ये

“स्वच्छता शीघ्रकृती दल” म्हणजेच, “Emergency Response Sanitation Unit “ (ERSU) ची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींच्या अनुषंगाने हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या प्रभावी अंमलबजावणीकरीता खालील प्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

(१) हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या अंमलबजावणी संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र. ५८३/२००३ मध्ये दिनांक २७/३/२०१४ रोजी पारित केलेल्या खालील आदेशाची अंमजबावणी राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी करणे बंधनकारक आहे.-

(i) If the practice of Manual Scavenging has to be brought to a close and also to prevent future generations from the inhuman practice of Manual Scavenging, rehabilitation of Manual Scavengers will need to include-

**(a) Sewer Deaths -** Entering sewer lines without safety gears should be made a crime even in emergency situations. For each death, compensation of Rs. १० lakhs should be given to the family of deceased.

(ii) Identify the families of all persons who have died in sewage work (manholes, septic tanks) since १९९३ and onwards compensation of Rs. १० Lakhs for each such death to the family members depending on them.

**(२)** हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या अंमलबजावणी संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाची अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने राष्ट्रीय अनुसूचित जाती आयोगाने खालील निर्देश दिले आहेत. सदर निर्देशांची अंमजबावणी राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी करणे बंधनकारक आहे.:-

(अ) Workers have to be fully equipped with safety apparatus & oxygen masks etc, in case they have to clean sewers manually.
(सेप्टिक टँक, भूमिगत गटारे स्वच्छ करीत असताना सफाई कामगारांना सुरक्षा उपकरणे व ऑक्सिजन मुखवटे तसेच हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ मध्ये नमूद करण्यात आलेली सामुग्री उपलब्ध करून देण्यात यावी.)

(ब) The FIR has to be lodged against officials responsible / contractors responsible for sending an un-equipped person for manual cleaning of sewers.
(सफाई कामगारांना आवश्यक साहित्यासह म्हणजेचे सुरक्षा उपकरणे व ऑक्सिजन मुखवटे इत्यादी विना सेप्टिक टँक, भूमिगत गटारांच्या साफसफाई करीता उतरविल्यास जबाबदार अधिकारी / कंत्राटदारांविरूद्ध एफआयआर दाखल करण्यात यावा.)

(क) All Municipal Corporations / Municipal Councils / Nagarpanchayats have to take a policy of Rs. 10 lakh sum insured / worker as per Hon'ble Supreme Court's directions. The workers have to be fully equipped with safety apparatus in case they have to clean sewers manually.
(मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार सर्व महानगरपालिका / नगरपरिषद / नगरपंचायतींना सेप्टिक टँक, भूमिगत गटारे साफसफाई करणाऱ्या कर्मचाऱ्याचा रु. १० लाखांचा विमा उतरविणे आवश्यक राहिल. तसेच, सफाई कामगार गटारे स्वच्छ करीत असताना सुरक्षा उपकरणे व ऑक्सिजन मुखवटे तसेच, हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ मध्ये नमूद करण्यात आलेली सामुग्री उपलब्ध करून देण्यात यावी.)

(ड) As per rule 7(v) of Prohibition of employment as manual Scavengers and their rehabilitation rules, 2013 (PEMSR, Rules 2013), the employer shall ensure that the assigned person has life insurance policy of at least Rs. 10 lakh and the premium of such shall be paid by the employer.
(हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ मधील कलम ७(v) नुसार सेप्टिक टँक, भूमिगत गटारे साफसफाई करण्याऱ्या व्यक्तीचा किमान रू. १० लाखाचा विमा असणे आवश्यक आहे आणि त्या विमाचा हप्ता सदर कर्मचाऱ्याची नियुक्ती करणाऱ्या यंत्रणेमार्फत भरणे आवश्यक राहील.)

२. राज्यातील सर्व नागरी क्षेत्रात मलनि:सारण वाहिन्यांची/मलनि:सारण प्रक्रिया प्रकल्प केंद्रांची/ गटारी/ नाल्यांची सफाई करताना अथवा सेप्टिक टँक तसेच, एफएसटीपी ची देखभाल व दुरूस्ती/सफाई करताना कर्मचाऱ्यांचा अपघात झाल्यास, त्यांना तातडीने मदत पोहोचविण्यासाठी राज्यातील सर्व महानगरपालिका क्षेत्रांमध्ये महानगर पालिका आयुक्तांच्या व नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रामध्ये मुख्याधिकाऱ्यांच्या देखरेखीखाली "स्वच्छता शीघ्रकृती दल" म्हणजेच, "Emergency Response Sanitation Unit " (ERSU) स्थापन करण्यात यावे.

२.१ या दलाची स्थापना करताना पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

i) संबंधित आयुक्त व मुख्याधिकारी या दलाचे Responsible Sanitation Authority(RSA) अर्थात, प्रमुख असतील.
ii) या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र १ अनुसार कार्यशाळा / परिषदेचे आयोजन करावे.
iii) महानगर पालिका / नगर परिषदेच्या एका वरिष्ठ अधिकाऱ्याच्या अधिपत्याखाली या दलाची स्थापना करावी. यासंदर्भात ERSU Advisory मध्ये मुद्या क्रमांक ७ मध्ये नमूद केल्यानुसार इतर संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचा समावेश करण्यात यावा.
iv) मॅनहोल मध्ये उतरून गटारी, मैला प्रक्रिया केंद्राची साफसफाई करण्यासाठी ERSU Aviosry मधील परिशिष्ट १, २ व ३ अनुसार मानक कार्यप्रणाली (*SOP*) ठरवावी.
v) या दलास संपर्क करण्यासाठी एक स्वतंत्र टोल फ्री संपर्क क्रमांक असावा.

vi) साफसफाईसाठी गटारीत उतरणाऱ्या सफाई कर्मचाऱ्यांना योग्य प्रशिक्षण देऊन त्या कर्मचाऱ्यांना शीघ्रकृती दलाकडून प्रमाणित करण्यात यावे. तसेच, उचित स्वसंरक्षणाच्या उपकरणांसह (PPE) दल अद्ययावत ठेवावे.

vii) शीघ्रकृती दलाकडून प्रमाणित करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त इतर कोणासही गटारीत उतरण्याची परवानगी देण्यात येऊ नये.

viii) समांतररित्या, यांत्रिक साफसफाईस प्रोत्साहन द्यावे व यांत्रिक साफसफाई आपल्या शहरात सुरु करण्यासाठी ERSU Aviosry या कार्यपुस्तिकेनुसार कार्यवाही सुरु करावी.

ix) दुर्दैवाने सफाई कर्मचाऱ्याच्या मृत्यूची घटना घडल्यास घटनेची जबाबदारी निश्चित करून फौजदारी कारवाईची कार्यवाही करावी.

३. उपरोक्त सूचनांची अंमलजबावणी राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करणे बंधनकारक आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००१३०१७३३०७७२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2020.02.06 15:04:22 +05'30'

**(अजित पालवे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, सर्व.
९. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१०. जिल्हाधिकारी, सर्व.
११. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१२. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई
१३. मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत (सर्व)
१४. निवड नस्ती नवि-३४

# प्रपत्र १

Annexure-1

**Suggested Outline for for City level Conferences on "Technologies for Cleaning Sewers and Septic Tanks with the Objective of Eliminating Human Entry into Septic Tanks/ Manholes"**

**Inaugural session**

Hon'ble MP, MLA, MLC, Mayor, Principal Secretary of UD/ Public Health Engineering Department & Social Welfare Department, District Magistrate and Municipal Commissioner may be invited to address in this session.

**Technical Sessions**

(i) Legal aspects on O&M of cleaning of Sewers and septic tanks.

(ii) State Level Action Plan for Effective Implementation of the Provisions of the Act.

(iii) Establishment of ERSU and its roles and responsibilities.

(iv) Best O&M Practices of Sewerage System including Mechanical Cleaning of sewers and Septic Tanks by the cities.

(v) Presentation of Latest Equipment and Machineries and safe practices and protective equipment/ gear.

(vi) Integration of sanitation workers both formal and informal with Govt. welfare scheme.

(vii) Schemes available for procurement of equipment and machinery for cleaning of sewers and septic tanks.

**Participants:** Swachhagrahis, Important Public Figures, RWA Presidents, NGO/CSO engaged in this kind of activities, Officials of Urban Development and PHE Departments, Swacchkarmis Organisations, Rag-pickers Associations, local sanitation service providers/ contractors and representatives from hotels and other institutes with large septic tanks.

**Duration:** At least half day (4-5 hrs)

**Preferred:** Sewer and septic tank cleaning equipment/gear to be displayed.